मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत बंद असलेल्या मौ. पुरजळ व २० गांवे (ता.औढा नागनाथ/ वसमत ) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजनेच्या अंमलबजावणी करिता निधी वितरीत करणेबाबत.

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१९/प्र.क्र.९९/पापु-१९

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: १७ डिसेंबर, २०१९

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
२) शासन निर्णय क्रमांक: मुपयो-२०१६/प्र.क्र.८३/पापु-१९, दिनांक २५ जानेवारी, २०१७
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०१९
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९
५) शासन निर्णय क्रमांक: मुपयो-२०१८/प्र.क्र.१७७/पापु-१९, दिनांक १३ फ़ेब्रुवारी, २०१९

**प्रस्तावना:-**

राज्यातील ग्रामीण जनतेस शुध्द व पुरेसे पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्यात सन २०१६-१७ ते २०१९-२० या कालावधीत मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम राबविण्यात येत आहे. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुनरुज्जिवित करावयाच्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनेच्या अंमलबजावणीकरिता (लेखाशिर्ष क्रमांक २२१५ ९९५१) सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता रु.४०.०० कोटी इतक्या निधीची अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली असून, वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील परिपत्रकान्वये प्रथम नऊमाहीकरिता ( डिसेंबर २०१९ अखेर ) एकूण वार्षिक तरतुदीच्या ६० टक्केप्रमाणे अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर रु.२४.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधीतून मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुनरुज्जिवित करण्यास मंजुरी देण्यात आलेल्या मौ. पुरजळ व २० गांवे (ता.औढा नागनाथ/ वसमत ) प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजनेच्या अंमलबजावणी करिता जिल्हा परिषद, हिंगोली यांना रु.१६९.७० लक्ष इतके अनुदान मंजूर व मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत संदर्भाधीन क्र.५ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या मौ. पुरजळ व २० गांवे (ता.औढा नागनाथ/वसमत, जि. हिंगोली) या प्रादेशिक नळ पाणीपुरवठा योजनेच्या पुनरुज्जिवनाकरिता रु.१६९.७० लाख (अक्षरी रुपये एक कोटी एकोणसत्तर लाख सत्तर हजार फ़क्त) इतका निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (BDS) खालील अटींच्या अधीन राहून मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

I. जिल्हा परिषद, हिंगोली यांनी हे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्या विनिर्दिष्ट प्रयोजनासाठीच खर्च करावे.

II. सदर निधी सन २०१९-२० या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे. तो व्यपगत होणार नाही अथवा कोषागारातून आहरित करुन बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

III. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत दिलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार नळ पाणी पुरवठा योजनांचे त्रयस्थ तांत्रिक परिक्षण करुन घेण्याची व उपस्थित निरीक्षणांची पुर्तता करण्याची सर्वस्वी जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणाची राहील.

IV. ज्या पाणीपुरवठा योजनेच्या निविदा जादा दराने स्विकृत करण्यात आल्या असतील, अशा योजनांना सुधारित प्रशासकीय मंजूरी प्राप्त झाल्याशिवाय योजनेवर मूळ प्रशासकीय मंजूरीप्राप्त किंमतीपेक्षा जास्त खर्च करण्यात येऊ नये.

V. जिल्हा परिषदेकडे वितरीत करण्यात आलेला निधी स्वीय प्रपंजी (PLA) किंवा अशा अन्य खात्यामध्ये ठेवण्यात येऊ नये.

VI. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निधी मागणी करतांना चालू आर्थिक वर्षात वितरित करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादी बाबतची माहिती सादर केल्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार नाही.

VII. ज्या प्रयोजनासाठी निधी वितरित करण्यात आलेला आहे, त्याबाबतची भौतिक प्रगतीची माहिती संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दर तीन महिन्यानी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहित प्रमाणपत्र या विभागाकडे

तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी.

VIII. जिल्हा परिषदेने या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या व संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयातील तसेच मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची जिल्हा परिषदेकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १ /२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परिक्षणाकरीता जिल्हा परिषदेची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून जिल्हा परिषद संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

IX. अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना जिल्हा परिषदेने कार्यासन पापु-१९/पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई/नागपूर व पापु-१९ कार्यासनास सादर करावे.

X. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील शासन परिपत्रकातील तरतुदींचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच उक्त परिपत्रकान्वये आवश्यक असलेली प्रमाणपत्रे या विभागास सादर करण्यात यावीत.

२. याबाबतचा खर्च “मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२७) बंद पडलेल्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांचे पुनरुज्जीवन (२२१५ ९९५१)- ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच सदर प्रकरणी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील परिपत्रकातील परिच्छेद-७ मधील व त्यासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. ९ मधील अ.क्र. १ ते १० मधील आवश्यक त्या बाबींची पूर्तता होत आहे. परिशिष्टातील अ.क्र. १ ते ७ येथील अटींचा संबंध येत नाही.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२१२१२०७५४३३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2019.12.17 11:08:15 +05'30'

**(रा. अ. साबणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली
४) महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
५) महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, औरंगाबाद.
८) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
९) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, हिंगोली.
१०) निवड नस्ती (पापु-१९)